**राज्यातील चार प्रादेशिक मनोरुग्णालयांकरीता लोखंडी कॉट्स विथ कॉयर मॅट्रेसेस खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०२०/प्र.क्र.८४/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१.
दिनांक: १७ जुलै , २०२०.

संदर्भ-

१) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/लोखंडी कॉटस/ प्रशा. मंजूरी /मा.आ/टे-२/३४६१-६६/२०, दिनांक १५/०६/२०२०.

२)शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

प्रस्तावना -

संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांनी दिनांक १५/०६/२०२० च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, राज्यातील चार प्रादेशिक मनोरुग्णालयांत दाखल होणा-या रुग्णांकरीता (पुणे-२९० नग, ठाणे-१२५ नग, नागपूर-१०० नग, रत्नागिरी-५० नग) एकूण ५६५ लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेसची आवश्यकता आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१० ०२१७ अंतर्गत उपलब्ध अनुदानातून प्रति नग रु.११४९९/- प्रमाणे रु.६४,९६,९३५/- इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्तावित केले आहे.

प्रादेशिक मनोरुग्णालयांकरिता लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेस खरेदी करणे आवश्यक असल्याने, खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास तसेच BDS प्रणालीवर वितरीत केलेल्या निधीच्या मर्यादेतच खर्च करावा, या अटींच्या अधिन राहून ५६५ नग लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेस खरेदी करण्यासाठी रु.६४,९६,९३५/- फक्त इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

राज्यातील चारही प्रादेशिक मनोरुग्णालंयाकरीता लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेस खरेदी करणे आवश्यक असल्याने त्यासंबंधीची निविदा प्रक्रिया करण्यास तसेच सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात या प्रयोजनार्थ वितरीत असलेल्या निधीच्या मर्यादेतच खर्च करावा, या अटीवर तसेच खालील अटींच्या अधीन राहून प्रादेशिक मनोरुग्णालंयाकरीता ५६५ नग लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेस

खरेदी करण्यासाठी रुपये ६४,९६,९३५/- (रुपये चौसष्ट लाख शहाण्णव हजार नऊशे पस्तीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी-**

१) सदरहू लोखंडी कॉट विथ कॉयर मॅट्रेसेस खरेदी करण्याची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर लोखेडी कॉटचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खर्च लेखाशिर्ष क्रमांक २२१०-वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य ०१-नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा ११०-रुग्णालये व दवाखाने ०५ मनोरुग्णालय (०५)(०१)-प्रादेशिक मनोरुग्णालये २१ पुरवठा व सामुग्री (२२१००२१७) या लेखाशिर्षांर्तगत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

८) सदर बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,

भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

**उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील तसेच आवश्यकतेपेक्षा जास्त खरेदी झाल्यास, विनावापर पडून राहिल्यास मागणी नोंदविणारे संबंधित अधिकारी जबाबदार असतील.**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.६, नियम क्र.४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१५१५२८४५२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.07.17 15:23:27 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१-२, (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) अधिक्षक, विभागिय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
११) निवडनस्ती (आरोग्य-८)